**महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या पाणी पुरवठा व मलनि:स्सारण योजनांना अनुदान वितरीत करण्याबाबत.**
**नगर परिषद इंदापूर, जि. पुणे**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुनिअ-२०१३/प्र.क्र.४९७/पापु.२२**
गोकुळदास तेजपाल हॉस्पिटल संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ११ ऑक्टोबर, २०१८

**वाचा :**
**१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. नापापु-२००८/प्र.क्र.१/पापु-२२,दि. २२.१०.२००८**
**२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.नापापु-२००८/प्र.क्र.१९८/पापु-२२, दि.२३.१२.२००८**
**३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०११/प्र.क्र.५६५/पापु-२२, दि.१५.१०.२०११**
**४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१३/प्र.क्र.४९७/पापु-२२, दि.०१.११.२०१३**
**५) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ-२०१३/प्र.क्र.४९७/पापु-२२, दिनांक १८.०३.२०१४**
**६) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ-२०१३/प्र.क्र.४९७/पापु-२२, दिनांक ०९.०९.२०१४**
**७) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.सुनिअ-२०१३/प्र.क्र.४९७/पापु-२२, दिनांक २३.११.२०१५**
**८) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.सुनिअ-२०१३/प्र.क्र.४९७/पापु-२२, दिनांक १२.०५.२०१६**
**९) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ-२०१३/प्र.क्र.४९७/पापु-२२,दिनांक १६.११.२०१६**
**१०) मुख्याधिकारी, इंदापूर नगरपरिषद, इंदापूर यांचे पत्र क्र.इंनप/पापु/१५३२/२०१७/१८, दिनांक १२.१०.२०१७**

**प्रस्तावना :**

दिनांक २२ ऑक्टोबर, २०१०८ च्या शासन निर्णयान्वये नागरी पाणी पुरवठा, मलनि:स्सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त,गुणवत्तापुर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:स्सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे असा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दिनांक १५.१०.२०११ अन्वये इंदापूर शहर पाणी पुरवठा योजनेच्या एकूण रु. ३४,९४,६७,०००/- इतक्या ढोबळ किंमतीच्या भांडवली कामांस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे यांनी इंदापूर शहर पाणी पुरवठा योजनेच्या भांडवली कामांच्या एकूण रु. ३४,९४,६७,०००/- इतक्या किंमतीस तांत्रीक मान्यता दिली आहे. सदर शासन निर्णयाप्रमाणे, इंदापूर नगर परिषदेस रु. ३१,४५,२०,३००/- इतके अनुदान

अनुज्ञेय असून इंदापूर नगर परिषदेने स्वहिश्श्यापोटी रुपये ३४९.४७ लक्ष इतकी रक्कम बँकेत भरणे आवश्यक आहे. त्यापैकी इंदापूर नगर परिषदेने एकूण रुपये ३४९.४७ लक्ष इतकी रक्कम बँकेमध्ये जमा केली आहे. इंदापूर नगरपरिषदेने यापुर्वी बँकेत भरलेल्या रु. २८९.०४ लक्ष इतक्या रक्कमेच्या प्रमाणात शासन निर्णय, दिनांक ०१.११.२०१३ अन्वये रु. ४५४.५० लक्ष, शासन निर्णय, दिनांक १८.०३.२०१४ अन्वये रुपये ५२६.८५ लक्ष, शासन निर्णय, दिनांक ०९.०९.२०१४ अन्वये रु. २२४.८३ लक्ष, शासन निर्णय, दिनांक २३.१०.२०१५ अन्वये रुपये ७६५.१६ लक्ष, शासन निर्णय, दिनांक १६.११.२०१६ अन्वये रुपये ३६०.०० लक्ष असे एकुण रुपये २६०१.३३ लक्ष इतके अनुदान इंदापूर नगर परिषदेस वितरीत करण्यात आले आहे. मुख्याधिकारी, इंदापूर नगर परिषद यांनी प्राप्त झालेल्या अनुदानापैकी रुपये ३०१६.०४ लक्ष रुपयाचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार, पुणे यांनी सादर केलेल्या योजनेतील कामांच्या प्रगतीच्या गोषवा-यानुसार योजनेतील मंजूर कामे ९३.९४ % पुर्ण झाली असल्याबाबत उपांगनिहाय अहवाल सादर केला आहे. इंदापूर नगर परिषदेने स्वहिश्श्याची संपुर्ण रक्कम रु.३४९.४७ लक्ष रक्कम संबंधित बँक खात्यामध्ये जमा केली असून त्याप्रमाणात मुख्याधिकारी, इंदापूर नगरपरिषदेने अनुज्ञेय अनुदानापैकी उर्वरित अनुदान वितरीत करण्याची विनंती केली आहे. सदर बाबी विचारात घेता, इंदापूर नगर परिषदेस अनुज्ञेय असलेल्या रु. ३१,४५,२०,३००/- शासकीय अनुदानापैकी ९० % अनुदान रु.२८,३०,६८,२७०/- इतक्या अनुदानापैकी सदर योजनेस यापुर्वी रु. २६,०१,३३,०००/- अनुदान वितरीत करण्यात आले असल्याने उर्वरित रु. २,२९,३५,२७०/- इतके अनुदान इंदापूर नगर परिषदेस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दिनांक १५.१०.२०११ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या इंदापूर शहर पाणी पुरवठा योजनेच्या भांडवली कामांकरीता एकूण अनुज्ञेय अनुदानापैकी उर्वरित अनुदान रु. २,२९,३५,२७०/- ( रुपये दोन कोटी एकोणतीस लक्ष पस्तीस हजार दोनशे सत्तर फक्त ) पुढील विवरणानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

( रक्कम रुपयांत )

| शहराचे नांव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेने निकषानुसार भरावयाची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | यापुर्वी वितरीत करण्यात आलेले अनुदान | राज्य शासनाकडून याद्वारे वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| इंदापूर नगर परिषद | ३४,९४,६७,००० | ३१,४५,२०,३०० | ३,४९,४६,७०० | ३,४९,४६,७०० | २६,०१,३३,००० | २,२९,३५,२७० |
| | | | | | **एकुण रुपये** | **२,२९,३५,२७०** |

२. सदर योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय होणाऱ्या सदर अनुदानावरील खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगर पालिका इत्यादींना सहाय्य - राज्य योजना - (०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहायक अनुदान (२२१५ १६४७), ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी सदर लेखाशिर्षाखाली शासनाकडून उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त विवरणपत्रातील नमूद स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगीता प्रमाणपत्रे नियमितपणे वेळोवेळी शासनास सादर करावी.

४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधीत नागरी संस्थानी शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक- नापापु २००८/प्र.क्र.१/पापु-२२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१८१०१११७५००८४२२८** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Jairam Tumram

Digitally signed by Sunil Jairam Tumram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873e6409c70b0a0219d717dd6767c9aec9dd2d61ecf0cc982e9e93ef57312675, cn=Sunil Jairam Tumram
Date: 2018.10.12 11:44:04 +05'30'

**( सु.ज. तुमराम )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

- मा.मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव,विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- अपर मुख्य सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
- महालेखापाल १ -मुंबई/नागपूर.
- विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.

- सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
- संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
- जिल्हाधिकारी, पुणे
- संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, पुणे.
- कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे
- जिल्हा प्रकल्प अधिकारी ( नगरपालिका ), जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे
- जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
- मुख्याधिकारी, इंदापूर नगर परिषद, जि. पुणे
- वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- कक्ष अधिकारी, पापु.०४, पापु-०५, पापु.२०,पापु.२१, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- निवडनस्ती, पापु-२२.